**जल जीवन मिशन कार्यक्रमांतर्गत मौजे-सावखेडे सिम,(ता.यावल, जि.जळगाव) येथील नळ पाणी पुरवठा योजनेच्या सुधारीत अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः ग्रापापु - २०२४/प्र.क्र.१३७/पापु-१८**
**७ वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल,**
**लोकमान्य टिळक मार्ग, मंत्रालय, मुंबई-४०० ००१**
**दिनांक: २२** ऑगस्ट, २०२४.

**वाचा :-**

१) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, जळगाव यांचे प्रशासकीय मान्यता आदेश, दि. १९.१०.२०२२.
२) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, जळगाव यांचे मूळ तांत्रिक मान्यता आदेश, दि. ०८.०९.२०२२
३) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, जळगाव यांचे पत्र, जा.क्र./ ग्रापापुवि/ ताशा-२/आरआर/४१३/२०२४, दि.०७.०५.२०२४.
४) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, जळगाव यांचे सुधारीत तांत्रिक मान्यता आदेश, दि. १०.०१.२०२४.

**प्रस्तावना :-**

मौजे-**सावखेडे सिम,**(ता.यावल,जि.जळगाव) येथील नळ पाणी पुरवठा योजनेच्या अंदाजपत्रकास संदर्भ क्रमांक २ अन्वये कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, जळगाव यांनी मूळ अंदाजपत्रकास तांत्रिक मान्यता प्रदान केली आहे. तसेच संदर्भ क्रमांक १ अन्वये मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, जळगाव यांनी रु. ८६.६३/- लक्ष इतक्या ढोबळ किंमतीस प्रशासकीय मान्यता प्रदान केली आहे.

मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, जळगाव यांनी प्रस्तुत नळ पाणी पुरवठा योजनेस सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव, संदर्भाधीन पत्र क्रमांक ३ येथील दि. ०७.०५.२०२४ रोजीच्या पत्रान्वये शासनास सादर केला आहे. सदर प्रस्तावास संदर्भ क्रमांक ४ अन्वये कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, जळगाव यांनी दिलेल्या सुधारित तांत्रिक मान्यतेस अनुसरून येणाऱ्या किंमतीस सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

"जल जीवन मिशन कार्यक्रम" मौ-सावखेडे सिम, ता.यावल, जि. जळगाव येथील नळ पाणी पुरवठा योजनेस जादा दराची निविदा स्वीकृती व वस्तु व सेवा कराच्या (GST) दरामध्ये इत्यादी

कारणांमुळे योजनेच्या किंमतीमध्ये वाढ झाल्याने योजनेच्या रु. ९०.९६/- लक्ष (रुपये नव्वद लक्ष शहाण्णव हजार फक्त) ढोबळ किंमतीस पुढील अटींच्या अधीन राहून सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

## अटी

१. उपरोक्त नमुद सुधारीत किंमतीत उर्वरित सर्व कामे विहित मुदतीत पूर्ण करण्याची जबाबदारी मुख्य कार्यकारी अधिकारी/मुख्य अभियंता यांची राहील.

२. या योजनेस सहमती दिलेल्या मूळ प्रशासकीय मान्यतेच्या तसेच तांत्रिक मान्यता देतांना नमुद केलेल्या अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

३. ही योजना पूर्ण झाल्यावर ती संबंधित ग्रामपंचायतीच्या ताब्यात देण्यात यावी. संबंधित कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग,जिल्हा परिषद यांच्याकडून योजना प्रत्यक्षात पूर्ण झाली आहे, या आशयाची सूचना मिळाल्याच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत योजना ताब्यात घेण्यास संबंधीत ग्रामपंचायत/जिल्हा परिषद जबाबदार राहील. योजना प्रत्यक्षात पूर्ण झाल्यावर लगेच संबंधित कार्यकारी अभियंता, जिल्हा परिषद व संबंधित ग्रामपंचायतचे अधिकारी यांनी योजनेची संयुक्तपणे पाहणी आयोजित करावी आणि अशा पाहणीत कोणतेही दोष आढळून आल्यास योजना ताब्यात देण्यापूर्वी ते सुधारण्यात यावेत.

४. ही योजना राबविणे, त्याचे परिरक्षण, दुरुस्त्या (विशेष दुरुस्त्या धरुन) या साठी दरवर्षी येणारा आवर्ती खर्च भागविण्यासाठी, योजनेतील घसारा किंवा यंत्रसामुग्री नुतनीकरणासाठी संबंधित ग्रामपंचायतीस/जिल्हा परिषदेस शासनाकडून कोणतीही मदत मिळणार नाही.

५. सदर योजना पुर्ण झाल्यावर स्थानिक स्वराज्य संस्थेने ( संबधित ग्रामपंचायत/ जिल्हा परिषद) योजना हस्तांतरित करुन घेणे बंधनकारक राहील. तसेच योजनेचे लेखे बंद करण्यात यावेत.

६. सन २०१३ मधील CAG च्या अहवालानुसार राज्यातील २१% पाणी पुरवठा योजना या देखभाल दुरुस्ती अभावी, वीज देयक न भरल्यामुळे ( Poor maintenance/nonpayment of electricity of bills) बंद पडल्या असल्याचे दिसून येते. यास्तव सदर योजना आर्थिकदृष्ट्या सक्षम राहण्याच्या दृष्टीने पाणीपट्टी दरामध्ये आवश्यकतेनुसार वाढ करण्याची जबाबदारी संबधित ग्रामपंचायत/जिल्हा परिषद यांची राहील.

७. हगणदारीबाबतच्या प्रचलित धोरणानुसार कार्यवाही करण्यात यावी.

८. प्रस्तुत योजना कोणत्याही परिस्थितीत पुनर्सुधारीत केली जाणार नाही याची जबाबदारी जिल्हा परिषदेची राहील.

९. जल जीवन मिशन अंतर्गत प्रशासकीय खर्च अनुज्ञेय नसल्याने जर सदर योजनेच्या सुधारीत अंदाजपत्रकामध्ये ४ टक्के प्रशासकीय खर्च घेण्यात आलेला असेल, तर तो वगळण्यात यावा.

०२. ज्या योजनांच्या निविदा दि. २१.०६.२०२२ पूर्वी स्वीकृत करण्यात आल्या आहेत, अशा योजनेच्या सुधारीत किंमतीतील वाढीव खर्च जल जीवन मिशन कार्यक्रमाच्या केवळ राज्य हिस्याच्या मंजुर अनुदानातुन भागविण्यात यावा.

**तसेच** ज्या योजनांकरीता दि.२१.०६.२०२२ व तद्नंतर कार्यादेश देण्यात आले आहेत. अशा योजनांना Discovered/Approved Cost संकल्पना लागू आहे. सदर योजनेकरीता Discovered/Approved Cost च्या मर्यादेपर्यंतचा खर्च जल जीवन मिशन कार्यक्रमाच्या वेळोवेळी निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सुचनांप्रमाणे केंद्र व राज्या हिश्याच्या मंजुर अनुदानातून भागविण्यात यावा. तसेच सुधारीत प्रशासकीय मान्यतेनुसार मंजुर किंमतीतुन Discovered/Approved Cost वजा जाता शिल्लक खर्च हा जल जीवन मिशन कार्यक्रमाच्या केवळ राज्य हिश्याच्या मंजुर अनुदानातुन भागविण्यात यावा.

०३. सदर सुधारीत प्रशासकीय मान्यता म्हणजे क्षेत्रीय कार्यालयांकडून प्राप्त प्रस्तावातील तांत्रिक बाबी, निविदा विषयक केलेली कार्यवाही व क्षेत्रीय निर्णय किंवा अनियमितता असल्यास त्यास शासनाची मान्यता गृहीत धरण्यात येऊ नये. सबब असे प्रकरण उद्भवल्यास त्यास संबंधित अंमलबजावणी यंत्रणा सर्वस्वी जबाबदार असेल.

**०४. प्रस्तुत योजनेस सुधारीत प्रशासकीय मान्यता ही वित्त विभागाच्या दि. १७/०४/२०१५ च्या क्रमांक विअप्र-२०१३/प्र.क्र. ३०/२०१३/विनियम, भाग-२ या शासन निर्णयातील भाग पहिला, उपविभाग-३ मधील अ.क्र. ६ (सहा) परिच्छेद क्र. २७ (अ) अनुसार विभागास प्रदान करण्यात आलेल्या प्राधिकारानुसार देण्यात येत आहेत.**

०५. "जल जीवन मिशन कार्यक्रम" अंतर्गत Shifting of connections ची परवानगी नसल्याने सदर तरतूद सुधारित योजनेत केली असल्यास त्याची अंमलबजावणी करु नये.

०६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०८२२११०२०२७३२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SMITA SANJAY BAGUL

Digitally signed by SMITA SANJAY BAGUL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, 2.5.4.20=25e12554b13903a35f36dc0d967bc182927874dabe4a3a64094e6e38959e6dec, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5B8292980F96B60D7F893A1812D84830343E177DA6046DD766352E47DFB7DEA8, cn=SMITA SANJAY BAGUL
Date: 2024.08.22 14:58:08 +05'30'

**( स्मिता बागुल)**
**कक्ष अधिकारी,महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१) मा. मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा. राज्यमंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा/ विधान परिषद.
४) मा. विधानमंडळ सदस्य (सर्व)
५) प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
६) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
७) अभियान संचालक, राज्य पाणी व स्वच्छता मिशन, बेलापूर, नवी मुंबई.
८) जिल्हाधिकारी, जळगाव.

९)  मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, जळगाव.
१०) महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१ मुंबई, महाराष्ट्र-२ नागपूर.
११) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता,) महाराष्ट्र-१ मुंबई, महाराष्ट्र-२ नागपूर.
१२) मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, प्रादेशिक विभाग, नाशिक.
१३) अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, जळगाव.
१४) संचालक (वित्त), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, सिडको भवन, बेलापूर,नवी मुंबई.
१५) आयुक्त, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे.
१६) वरिष्ठ भुवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, जळगाव
१७) कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण विभाग, जळगाव.
१८) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, जळगाव.
१९) अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
२०) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
२१) मु.अ. तथा वि.का.अ. पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
२२) अवर सचिव (संबंधित कार्यासन)
२३) कार्यासने (पापु-०४ व २०), पा. पु. व स्व.वि., मंत्रालय,मुंबई-३२.
२४) निवड नस्ती कार्यासन पापु-पापु-१८.